मौजे अन्वी (ता.सिल्लोड, जि. औरंगाबाद ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो - २०१६/प्र.क्र. २०७/पापु १८
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२
तारीख: २ डिसेंबर, २०१६

वाचा -

१) ग्रामपंचायत अन्वी, ता. सिल्लोड,जि. औरंगाबाद यांचा ग्रामसभा ठराव क्र. ९, दि. २१/२/२०११.
२) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मजीप्रा नावग्रायोमंऔ/भानिक/तांशा/२०१३/७७६, दिनांक २८/०३/२०१३.
३) शासन पत्र क्र. पापुयो-११/२०१४/प्र.क्र. २२/१८, दि. ४/१२/२०१४.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद क्र. जिपऔ/पापु/तांशा-३/२०१६/२५५२, दि. २३/११/२०१६.

प्रस्तावना

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे अन्वी (ता.सिल्लोड, जि. औरंगाबाद) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,६६,४०,६७६/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.**१** येथील ग्राम सभा ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. मात्र अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सदर योजनेच्या रु.१,४६,१८,२००/- (ढोबळ) किंमतीस तांत्रिक मान्यता दिली होती. तथापी सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदा प्राप्त झाल्यामुळे सदर ज्यादा दराच्या निविदेस संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये मंजूरी देण्यात आली आहे. प्रस्तुत योजनेच्या ज्यादा दराच्या निविदा प्राप्त झाल्यामुळे तसेच योजनेच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे योजनेच्या किंमतीत वाढ झाली असल्याने **कार्यकारी** अभियंता, **ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प., औरंगाबाद यांनी** संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या **रु. १८९.३५ लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास तांत्रिक सहमती दर्शविली आहे. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

**मौजे अन्वी (ता.सिल्लोड, जि. औरंगाबाद)** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. १,८९,२१,७०१/- (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी एकोणनव्वद लक्ष एकवीस हजार सातशे एक फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. सदर सुधारीत योजनेस सक्षम प्राधिका-यांकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.
२. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.
३. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
४. सदर योजना पुर्ण होऊन हस्तांतरीत झालेली असल्याने, सदर योजनेचे लेखेजोखे तात्काळ बंद करण्यात यावेत.
५. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.
७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.
८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. २४,३६,९९६/- (अक्षरी रुपये चोवीस लक्ष छत्तीस हजार नऊशे शहाण्णव फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०२१२३६२१९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2016.12.02 14:29:30 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, औरंगाबाद
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
१०) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
११) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१४) कक्ष अधिकारी (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.

१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.